# स्वप्ने व जन्म गुणांचा शारिरीक पुरावा

डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग ९

E Book 174

## डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय? भाग ९

प्राचार्य अद्वयानंद गळतगे भोज,५९१२६३. जि. बेळगाव (कर्नाटक) भ्र.९९०२००२५८५.

**<u>बोंगकुच प्रोमसिन:</u>**-

बोंगकुच प्रोमसिन थायलंडमधील सावन प्रांतातील दोन-खा या गावी १२फेब्रुवारी १९६२रोजी जन्मला. त्याचे वडील पामोर्न प्रोमसिन हायस्कूलचे मुख्याध्यापक होते.



Table 1 दोन-खा

बोंगकुच दोन वर्षांचा झाल्यावर सांगू लागला की दोन-खापासून ९ कि. मी. अंतरावरील हुवा तानोन या गावचा तो असून त्याचे नाव चामरात आहे. त्याने आपल्या पालकांचीही नावे सांगितली. त्याने आणखीही बरीच माहिती दिली ही सर्व नंतर बरोबर आढळून आली आहे. त्याने पुढे सांगितले की हुआ तानोन गावच्या जत्रेच्या वेळी दोघांनी आपला भोसकून खून केला व आपले घड्याळ व गळ्यातील सोन्याची साखळी काढून घेतली नंतर आपले प्रेत ओढत नेऊन दूर शेतात टाकले. <u>खून झालेल्या ठिकाणी असलेल्या एका झाडावर विदेही</u>

(लिंगदेहाच्या) स्वरूपात आपण सात वर्षे राहिलो. एके दिवशी पाऊस पडत असताना हल्लीचे वडील दिसले व त्यांच्या बरोबर बस मधून त्यांच्या घरी आलो. बोंगकुचच्या वडिलांनी नंतर सांगितले की आपली पत्नी बोंगकुचला गरोदर राहण्यापूर्वी  हुआ तानोन गावी आपण एका मीटिंगसाठी गेलो होतो. त्यावेळी पाऊस पडत होता. या संदर्भातील एक प्रसंगोचित घटना म्हणजे त्यांची पत्नी सावायी प्रोमसिन प्रोमकुचला गरोदर राहण्यापूर्वी चामरातचा (बोमकुचच्या पूर्वजन्मातील व्यक्तीचा) ज्या ठिकाणी खून झाला होता, तिथे बांबूचे अंकुर शोधण्यासाठी गेली होती. एकाद्या व्यक्तीचा मृत्यू झालेल्या ठिकाणी एकाद्या स्त्रीने भेट दिल्यानंतर मृत्यू झालेल्या व्यक्तीला गरोदर राहण्याचे असेच प्रकार पुनर्जन्माच्या अनेक प्रकरणात आढळून येतात.

बोंगकुचच्या पुनर्जन्माची बातमी हुवा तानोनच्या चामरातच्या कुटुंबाला नंतर पोहोचली व त्यांनी दोन-खाला भेट दिली. परस्परांच्या भेटीनंतर बोंगकूच सांगत असलेल्या सर्व गोष्टी खऱ्या ठरल्या. खून केलेल्या व्यक्तींना पोलिसांनी पकडले होते. पण पुराव्याअभावी त्यांना निर्दोष सोडून देण्यात आले होते. बोंगकुचने त्यांची नावे सांगितली होती व तो आपल्या खुनाचा बदला घेण्याची भाषा करू लागला होता. एका खांबाला आपले मारेकरी समजून त्यांची तो नावे घेऊन काठीने (ते हत्यार समजून) मारत असे. तो काही शब्द बोलत असे; पण ते प्रोमसिनच्या कुटुंबियांना कळत नसत. नंतर माहित झाले की ते लाओसच्या भाषेतील शब्द आहेत. चामरातचे हुआ तानोनमधील कुटुंब लाओसहून देशांतर करून थायलंडमध्ये येऊन राहिले होते. याचा अर्थ असा होतो की बोंगकूच हा पुनर्जन्म झाल्यानंतर न शिकलेली भाषा जन्मतःच बोलत होता. बॉमकुचच्या खाण्यावागण्याच्या सवयीही  चामरातच्या लाओसियन कुटुंबियांच्या सवयी होत्या. उदा. चिकट तांदळाचा भात खाणे, गलिच्छ वागणे, स्वच्छता न पाळणे.

पुनर्जन्म प्रकरणातील इतर काही मुलांप्रमाणे बोंगकुचला आपण लहान शरीरात आहोत याची जाणीव होई. क्वचित प्रसंगी त्याला प्रौढत्वाचे झटके येता व अशा वेळी तो न्हाव्याला आपली दाढी करायला सांगे! कधी कधी वयात आलेल्या स्त्रियांशी तो लगट करीत असे. तेव्हां त्यांना त्याचे आश्चर्य व भीती वाटे. एकदा एक वयात आलेली मुलगी प्रोमसिनच्या कुटुंबात काही दिवसासाठी  राहण्यासाठी आली होती. बोगकुचने तिला एकदा कुरवण्याचा प्रयत्न केला, तेव्हा ती घाबरून निघून गेली. मागच्या त्याच्या (चामरातच्या) जन्मात त्याने एका मुलीवर प्रेम केले होते, व तिच्याशी वाङनिश्चयही झाला होता. पण लग्न होण्यापूर्वी त्याचा खून झाला. त्याची संस्कार रुपी लैंगिकता अशा रीतीने या जन्मात प्रगट झाली होती. (बिशनचंद कपूरचे असलेच उदाहरण आपण पूर्वी पाहिले आहे. लेबेनॉनमधील इमद एलवार या मुलाचे ही असलेच एक उदाहरण आढळून आले आहे.)

वय वाढल्यानंतर बोंगकुच मागच्या जन्माच्या आठवणी विसरला व इतर सामान्य मुलांप्रमाणे त्याची वाढ झाली. चिकट तांदळाचा भात खाण्याच्या व गलिच्छ वागण्याच्या त्याच्या लाओसियन सवयी मात्र गेल्या नाहीत.

(**Children Who Remember Their Previous Lives -** Ian Stevenson, 1987)




**वीरसिंग:-** उत्तर प्रदेश मधील जिल्ह्याचे ठिकाण असलेल्या मुजफ्फरनगर या शहराजवळील सालीखेरी नावाच्या खेड्यात वीरसिंग याचा जन्म कालीरामसिंग व पत्नी परसेंडी देवी यांच्या पोटी १९४८ साली झाला. हे कुटुंब शेती करणारे व जातीने जाट होते. वीरसिंग तीन वर्षापेक्षा लहान असताना कधीकधी अन्न खाण्यास नकार देत असे. पुढे तीन वर्षाचा झाल्यावर बोलायला शिकल्यानंतर त्याची आई भाकरी भाजत असताना एकदम म्हणाला, “मी तुझ्या हातचे अन्न खाणार नाही. ” तिने त्याचे कारण विचारल्यानंतर म्हणाला, “मी तुझा मुलगा नाही. मी शिकारपुरच्या ब्राह्मणाचा मुलगा आहे” पुढे त्याने सांगितले की त्याच्या वडिलांचे नाव 'लक्ष्मीचंद' आहे. एकदा आपल्या घरावरील माकडांना पिटाळून लावताना आपल्या आत्याबरोबर छतावरून खाली पडल्यामुळे आपण मेलो. त्याने आपल्या पूर्वजन्माविषयी माहिती देणारी एकूण २४ विधाने केली असून त्यापैकी त्याचा मृत्यू कसा झाला या विषयीचे वरील विधान वगळता बाकीच्या त्याची सर्व विधाने नंतर बरोबर असल्याची आढळून आली आहेत. त्याने आपले नाव सोमदत्त असल्याचे सांगितले. शिकारपुर मधील आपल्या घराविषयी जमिनीविषयी घरातील आपल्या भावंडाविषयी त्याने नावासह सर्व माहिती बरोबर दिली आहे. घरावर आलेल्या माकडांना पिटाळून लावण्यासाठी तो (सोमदत्त) आपल्या आत्याबरोबर छतावर चढला होता. माकडांच्या भीतीने त्याच्या आत्याने सोमदत्तला बाजूला फेकले व तोल जाऊन ती छतावरून खाली पडली व जखमी झाली. या घटनेनंतर काही आठवड्यांनी आजारपणामुळे सोमदत्तचा मृत्यू झाला होता. पण छतावरून खाली पडण्याची घटना मोठी असल्यामुळे त्याने आपल्या मृत्यूशी ती जोडण्याची गल्लत केली होती. (मृत्यूच्या बाबतीत अशीच गल्लत पूर्व जन्माच्या अनेक प्रकरणात केल्या गेल्याची आढळून येते. बिशनचंदने मृत्यूच्या वेळच्या आपल्या वयाच्या बाबतीत ती गल्लत केल्याचे आपण पाहिले आहे.) मृत्यूच्या वेळी सोमदत्तचे वय चार वर्षाचे होते ही (मृत्यूची) घटना १९३७ सालची. वीरसिंगचा जन्म १९४८ साली झाला. म्हणजे या पुनर्जन्म प्रकरणात मृत्यू व जन्म यामध्ये ११ वर्षांचे अंतर आहे. भारतातील व्यक्तींचे मृत्यू व

पुनर्जन्म या मधील सरासरी अंतर चार वर्षापेक्षा कमी आढळून येते. त्या मानाने ११ वर्षांचे हे अंतर फार मोठे आहे. तेव्हा येथे हे लक्षात ठेवावे की सोमदत्त च्या मृत्यूनंतर तब्बल १५ वर्षांनी साडेतीन वर्षाचा वीरसिंग आपल्याच मागच्या जन्माची माहिती 24 विधानातून चार वर्षाच्या सोमदत्त या बालका विषयी देत होता. पण चोवीस विधानांची तपशीलवार माहिती मिळवून सुद्धा त्याचे वडील कालीरामसिंग याने - सालीखेरी पासून शिकारपूर केवळ आठ मैल अंतरावर असून सुद्धा- त्याच्या पूर्व जन्माविषयीच्या माहितीची खातरजमा करण्याची तसदी घेतली नाही. पण ब्राह्मणाचे अन्न खाण्याच्या वीरसिंगाचा हट्टामुळे व तो हट्ट त्याला पुरवावा लागल्यामुळे वीरसिंगचे पुनर्जन्म प्रकरण सालीखेरी गावात प्रसिद्ध झाले व एकाच वर्षात त्याची माहिती शिकारपूरमधील त्याचे पूर्वजन्मातील वडील लक्ष्मीचंद शर्मा यांच्या कानावर गेली. एका ब्राह्मणाचा जन्म जाट जातीत झाल्याच्या गोष्टीवर लक्ष्मीचंदचा प्रथम विश्वास बसला नाही. तथापि लक्ष्मीचंद त्या माहितीची खातरजमा करण्यासाठी एकदा सालीखेरीला गुपचूपपणे गेला व तेथील एका न्हाव्याच्या दुकानात जाऊन इतर लोकांमध्ये मिसळून बसला. नंतर वीरसिंग तेथे घेऊन येण्यासाठी निरोप पाठवला गेला. तेथे येताच वीरसिंगने लक्ष्मीचंदला हे माझे वडील म्हणून ओळखले, व लगेच त्याला मिठी मारली व त्याच्या मांडीवर लडिवाळपणे बसला.

नंतर लक्ष्मीचंदने त्याला शिकारपूरमधील आपल्या कुटुंबाविषयीची माहिती विचारली, तेव्हा तो म्हणाला, “माझा एक रविदत्त नावाचा लहान भाऊ आहे. सरला व कौसल्या नावाच्या दोन लहान बहिणी आहेत. प्रकाशी व कैलाशा नावाच्या दोन मोठ्या बहिणी आहेत. माझी आई बावली गावाची आहे. ” ही सर्व माहिती बरोबर होती व वीरसिंग आपल्या पंधरा वर्षांपूर्वी वारलेल्या सोमदत्ताचा पुनर्जन्म आहे याची लक्ष्मीचंदची खात्री झाली. पण यातील गंमत अशी की वीरसिंगने सांगितलेल्या आपल्या चार बहिणीपैकी सरला व कौशल्या या दोन लहान बहिणी व रविदत्त हा लहान भाऊ सोमदत्त मेल्यानंतर जन्मले होते. सोमदत्त मेल्यानंतर जन्मलेल्या या तीन भावंडांची नावासकटची माहिती वीरसिंग कशी सांगू शकला हा प्रश्न येथे निर्माण होतो. तसेच सोमदत्त मेल्यानंतर लक्ष्मीचंदच्या कुटुंबाने एक उंट खरेदी केला होता. त्या उंटाची माहिती वीरसिंगने बरोबर सांगितली. इतकेच नव्हे तर वीरसिंगला शिकारपूरला घेऊन गेल्यानंतर तो मेल्यानंतर जन्मलेल्या तीनही भावंडांना त्याने बरोबर नावे घेऊन ओळखले! मग सोमदत्त मरण्यापूर्वी जन्मलेल्या कैलाशी या मोठ्या बहिणीला (व आईलाही) त्याने ओळखले यात आश्चर्य नाही. याशिवाय त्याने आपल्या अंत्यविधीची ही बरोबर माहिती दिली आहे. आपल्या अंत्यविधीला आपले वडील लक्ष्मीचंद परगावी गेले असल्यामुळे व लवकर परत न आल्यामुळे हजर नव्हते. त्यामुळे आपल्या मामाने आपला अंत्यविधी उरकला असे वीरसिंगने सांगितले आहे आणि हे खरे होते. या सर्व गोष्टींचे रहस्य सोमदत्त हा वीरसिंग

म्हणून जन्मण्यापूर्वी ११ वर्षे विदेही (लिंगदेही) स्वरूपात राहून या सर्व गोष्टी पाहिल्या होत्या, या वस्तुस्थितीत दडले आहे. आपल्या घराजवळील पिंपळाच्या वृक्षावर मृत्यूनंतर विदेही स्वरूपात राहून या सर्व घटना आपण पाहिल्या असल्याचे त्याने म्हटले आहे. (बोंगकुचही मेल्यानंतर सात वर्षे मृत्यूचा ठिकाणच्या वृक्षावर असाच विदेही स्वरूपात राहिला होतात. इतरही पुनर्जन्म या प्रकरणात मृतात्मे असेच मृत्यूच्या ठिकाणाच्या वृक्षावर विदेही स्वरूपात काही वर्षे राहिल्याचे आढळून आले आहेत.)

अशा रीतीने विदेही (लिंगदेही) स्वरूपात वीरसिंगने आपला सोमदत्तचा अंत्यविधी तर पाहिलाच, पण पुढील ११ वर्षांच्या दरम्यानचे आपल्या वडिलांच्या कुटुंबातील तीन भावंडांचे जन्मही पाहिले. आपला मोठा भाऊ विष्णुदत्त याच्या - तो (सोमदत्त) मेल्यानंतर झालेल्या लग्नसमारंभात आपण उपस्थित होतो असेही त्याने म्हटले असून त्याप्रसंगी योजलेल्या जेवणातील मेजवानीतील पदार्थांचेही त्याने बरोबर वर्णन केले आहे. याशिवाय त्याने असेही सांगितले की आपण (सोमदत्त) आपल्या आईच्या (बिंद्रा देवीच्या) स्वप्नात येऊन सांगितले होते की विष्णुदत्त (थोरला भाऊ) हा रात्री गुपचूपपणे घरातून रामलीला या जत्रेत जातो व त्याच्या बरोबर आपणही (अर्थात विदेही स्वरूपात) जात असू. बिंद्रादेवीने असे (सोमदत्तने स्वप्नात येऊन सांगितल्याचे) स्वप्न आपल्याला पडले होते हे खरे आहे, असे म्हटले आहे. शिवाय ही स्वप्नातील सोमदत्त कडून माहिती झालेली जत्रेला जाण्याची गोष्ट खरी आहे काय, असे विष्णुदत्तला तिने विचारल्यानंतर त्याने होय. हे खरे आहे' असे म्हणून आपण चोरून रामलीलेच्या जत्रेला रात्री जात असल्याचे त्याने मान्य केल्याचेही तिने म्हटले आहे. वीरसिंगने आपल्या बिंद्रादेवी या (पूर्वजन्मातील) आईला तो (सोमदत्त) मेल्यानंतर कुटुंबाने खेळलेल्या एका कज्ज्याच्या प्रकरणाचीही माहिती दिली. जी बरोबर होती. वीरसिंगने आपल्या (सोमदत्तच्या) वडिलांना (लक्ष्मीचंदला) सांगितले की शिकारपूर मधील एक रहिवासी मुखतारसिंग याचे घर लुबाडल्या गेल्यामुळे तो गाव सोडून दुसऱ्या गावात राहायला गेला. ही गोष्ट खरी होती. या सर्व घटना चार वर्षाच्या सोमदत्त मेल्यानंतर घडलेल्या होत्या. आपल्या घराजवळील पिंपळाच्या झाडावर वसती केली असताना आपण त्या सर्व पाहिल्याचे त्याने म्हटले आहे. त्याने असेही सांगितले की पिंपळाच्या झाडाला बांधलेल्या झोपाळ्यावर झोके घेणाऱ्या काही स्त्रियामुळे आपल्याला त्रास होऊ लागल्यामुळे ज्या फांदीवर तो झोपाळा बांधला जात होता ती फांदी मोडण्याचा आपण प्रथम विचार केला होता. पण त्यामुळे त्या बायका झोपाळ्यावरून पडून मरतील असे वाटून झोपाळा जमिनीजवळ येताच बायका बसलेली फळीच आपण मोडली असे तो म्हणाला. अशा प्रकारची झोपाळ्याची घटना सोमदत्त मेल्यानंतर घडली होती हे खरे आहे असे लक्ष्मीचंद म्हटले आहे. (वरकरणी कारण दिसत नसलेल्या अशा घटनांना भानामती म्हणतात.)

शिकारपूरला वीरसिंगला नेल्यानंतर बरोबर ओळखलेल्या एकूण एक गोष्टी (व्यक्ती, वस्तू व घटना) वीस आहेत. विस्तारभयास्तव फक्त थोड्याच वर सांगितलेल्या आहेत. पहिल्या भेटीत तो काही दिवस लक्ष्मीचंद सर्वांच्या कुटुंबात राहिला नंतर अनुक्रमे सहा महिने, एक वर्ष दोन वर्ष त्यांच्या कुटुंबात तो राहिला. सालीखेरी सोडून शिकारपुरला एकूण तीन वेळा पळून जाण्याचा त्याने प्रयत्न केला होता. काही वर्षानंतर लक्ष्मीचंदचे कुटुंब नैनिताल जिल्ह्यातील खातिया या शहरात राहायला गेले. तेथे तो रेल्वेने गेला व तेथे एक महिना राहिला. त्याची निष्ठा अशा रीतीने दोन्ही कुटुंबात समान रीतीने विभागली गेली होती. पुढे एकवीस वर्षांचा झाल्यानंतर वीरसिंग स्टिव्हेन्सनना आपल्या लग्नाविषयी म्हणाला, “जाट मुलीशी लग्न केले तर ब्राह्मण वडील दुखावतील व ब्राह्मण मुलीशी लग्न केले तर जाट वडील दुखावतील म्हणून दोन्ही कुटुंबातील वडील वारल्यानंतर मी लग्न करणार आहे. ” कधी कधी दोन्ही कुटुंबापासून दूर निघून जावे असेही त्याला वाटते, असे तो स्टिव्हेन्सनना म्हणाला. पूर्वजन्माची आठवण कशी अडचणीची ठरते याचे हे उदाहरण आहे.

(**Cases of Reincaternation Type**. Vol I. Ian Stevenson. 1975)




**<u>संजीव शर्मा</u>:-** संजीव शर्मा यांचा जन्म सत्यपाल शर्मा व पत्नी सीता राणी यांच्या पोटी ४ मे १९७० रोजी दिल्लीत झाला. सत्यपाल शर्मा यांची १०० वर्षाची मातृक आजी (आईची आई) किर्पादेवी सत्यपाल शर्माकडे दिल्लीत एक वर्ष राहिल्यानंतर वृद्धावस्थेमुळे २४ ऑक्टोबर १९६९ रोजी वारली.

यापूर्वी ती पंजाबमधील रोपड शहरात वीस वर्षे एकटीच राहिली होती. पश्चिम पंजाब मधील गुजरांवाला जिल्ह्यातील एका खेड्यातील ती मूळ रहिवासी. कुटुंब ब्राह्मण. नवरा गणेशदास तिच्या तरुण वयातच वारला होता. तिला एक मुलगा व एक मुलगी होती. मुलगा १९७५ पूर्वी वारला. मुलगी रामप्यारी दिल्लीत आपल्या तीन मुलांपैकी सर्वात लहान असलेल्या सत्यपाल शर्मा या मुलाकडे राहत होती. १९४७ सालच्या देशाच्या फाळणीमुळे ८० वर्षाची किर्पादेवी शेजाऱ्यासह भारतात येऊन उत्तर पंजाब मधील (रोपारला*इंग्रजीत ड ला र उच्चारायची प्रथा आहे) रोपड या शहरात वीस वर्षे राहिली. शंभराव्या वर्षी वृद्धापकाळामुळे दिल्लीत आपल्या सर्वात लहान नातवाकडे सत्यपाल शर्माकडे राहायला आली होती. एक वर्षानंतर शंभराव्या वर्षी तेथे ती वारली. मृत्युपूर्वी सत्यपाल शर्माला तिने सांगितले की मी तुझ्या कुटुंबात जन्म घेणार आहे. किर्पादेवीची मुलगी सत्यपाल शर्माची आई, रामप्यारी हिची खात्री होती की आपला मुलगा सत्यपाल यांच्या पत्नीच्या - सीताराणीच्या - पोटी आपली आई (किर्पादेवी) नक्की जन्म घेणार. कारण किर्पादेवीच्या

अखेरीस त्याला बळकटी देणारे स्वप्न तिला नंतर पडले होते. शिवाय सीताराणीच्या थोरल्या मुलग्याच्या राजेशच्याही स्वप्नात मृत्यूनंतर दुसऱ्याच दिवशी येऊन किर्पादेवीने सांगितले की मला दुसरीकडे कुठे परत जन्म घेण्यास जागा नाही. याखेरीज मृत्यूनंतर थोड्याच दिवसात खुद्द सीताराणीला स्वप्न पडले की किर्पा देवी आपल्या पाठलाग करत आहे व आपण तिला चुकवण्यासाठी पळत आहोत. शेवटी किर्पादेवीने सीताराणीला गाठलेच. सिताराणीच्या पोटी जन्म घेण्याच्या किर्पादेवीच्या इच्छेचा हे सर्व स्वप्न संकेत मानता येईल. वर म्हटले आहे की ४ मे १९७० रोजी सीताराणीच्या पोटी संजीव शर्माचा जन्म झाला.

*आपली आई किर्पादेवी संजीवच्या रूपाने जन्मलेल्या रामप्यारीची इतकी खात्री होती कि तिने संजीवला आपली आई समजून जन्मल्यानंतर 'नमस्ते' म्हणून त्याला हात जोडले आणि संजीवनेही तिला प्रत्युत्तर आपले हात जोडले! किर्पादेवीच्या स्वतःकेलेल्या पुनर्जन्माच्या भाकिताखेरीज सत्यपालच्या कुटुंबातील तिघांना पडलेल्या या संबंधीच्या स्वप्नाखेरीज किर्पादेवी संजीवच्या रुपाने जन्मल्याचा एक प्रत्यक्ष जन्मजात शारीरिक पुरावा आढळला. तो पुरावा म्हणजे किरपा देवीच्या नाकाच्या डाव्या बाजूला गालावर काळा तीळ होता व त्यात दोन पांढरे केस उगवले होते. त्याच प्रमाणे संजीवच्या नाकाच्या डाव्या बाजूला गालावर तसाच काळातीळ जन्मतःच आढळून आला व त्याचे दोन पांढरे केस जन्मतःच उगवलेले दिसून आले. अशा रीतीने किर्पादेवीचे सत्यपालच्या कुटुंबात पुनर्जन्म घेण्याचे भाकित कुटुंबातील तीन सदस्यांना पुष्टी देणारी पडलेली ______________________________

* किर्पादेवी २४ऑक्टोबर १९६९ रोजी वारली हे वर सांगितलेच आहे .संजीवचा जन्म ४ मे १९७० रोजी झाला. याचा अर्थ सीताराणी किर्पादेवी मरण्याच्या तीन महिन्यापूर्वीच तिला संजीवच्या रूपाने गरोदर राहिली असा होतो. कारण २४ ऑक्टोबर १९६९ व ४ मे १९७० यामध्ये फक्त सहा महिन्याचे अंतर आहे. एकाद्या व्यक्तीला ती व्यक्ती मरण्यापूर्वी गरोदर राहण्याचा अवधी १ महिन्यापासून ९ महिने सुद्धा असू शकतो. भारतासह अन्य देशातही अशा घटना घडल्या आहेत भारतातीलच एक उदाहरण द्यायचे तर उत्तर प्रदेशातील मैनपुरी जिल्ह्यातील भूर नागरीया खेड्यात मुन्नाबाबू या माणसाचा खून ५ डिसेंबर १९७४ रोजी झाला व खुनाच्या दुसऱ्याच दिवशी म्हणजे ६ डिसेंबर १९७४ रोजी त्याचा जन्म त्या गावापासून २१ कि. मी. अंतरावर बेवार या गावी पुष्पाकुमारी चौहान हिच्या पोटी पंकज चौहान या नावाने झाला. ( **Reincarnation and Biology** Vol. I., p1118) येथे पुष्पाकुमारी मुन्नाबाबुला तो मरण्याच्या नऊ महिन्यापूर्वीच गरोदर राहिली आहे. एकाद्या व्यक्तीला ती व्यक्ती मरण्यापुर्वी एकादी स्त्री गरोदर राहणे कसे शक्य आहे, याची चर्चा स्टिव्हेन्सननी केलेली नाही. आपल्याला ती पुढे करावयाची आहे. स्वप्ने व जन्म गुणांचा शारिरीक पुरावा या सर्वांमुळे किर्पादेवी संजीवच्या रूपाने पुन्हा जन्मल्याची खात्री रामप्यारी व्यतिरिक्त इतर सर्व

कुटुंबियांना झाली. हे अशा रीतीने एक लिंगांतराचे उदाहरण ठरले आहे.

पुढे संजीव एक वर्षाचा झाल्यानंतर बोलू लागला व आपण रोपडहून आल्याचे सांगू लागला (रोपड मध्ये की किर्पादेवी २० वर्षे राहिली होती. हे मागे सांगितलेच आहे) मागच्या जन्माची माहिती एक वर्षाचे बालक बोलून सांगणे हे एक पुनर्जन्म प्रकरणातील अनोखे उदाहरण आहे असे स्टिव्हेन्सन यांनी म्हटले आहे. नंतरच्या काळात किर्पादेवीची सर्व वैयक्तिक लक्षणे संजीवमध्ये आढळून आली. उदा. किर्पादेवी बिडी ओढत असे. दीड वर्षाचा संजीव वडिलांकडे बिडी ओढायला मागू लागला होता. स्टिव्हेन्सननी जेव्हा साडे पाच वर्षाच्या संजीवची भेट घेतली तेव्हाही तो बिडी मागत होता असे त्यांना आढळून आले. किर्पादेवी धार्मिक होती. तीर्थयात्रा करी. संजीवही देवळांना जाऊ लागला होता. रामप्यारीला (आपल्या पैतृक आजीला) संजीव म्हणत असे, “पूर्वी तू माझी मुलगी होतीस. आता मी तुझा मुलगा (नातू) झालोय. ” एकदा जेवताना तो म्हणाला, “मला भरव” रामप्यारी म्हणाली, “आता तू लहान का आहेस, स्वतःच्या हातानी खा.” तेव्हा तो म्हणाला, “जेव्हा मी तुझी आई होतो व तू माझी लहान मुलगी होतीस, तेव्हा मी तुला भरवले नाही काय?” जुन्या काळात वाढलेल्या किर्पादेवीची सनातन वृत्ती संजीवमध्ये आढळून आली होती. मुलींनी पुरुष सोबत नसताना एकटीने बाहेर फिरू नये असे ती म्हणे. त्यांच्या दुहेरी वेणी घालण्याच्या नव्या फॅशनला तो कडाडून विरोध करी. त्याच्या वर्गशिक्षकेच्या या फॅशन विरुद्ध त्याने एकदा वर्गात इतका गहजब केला की त्यामुळे त्याला दुसऱ्या वर्गात घालण्यात आले. वृद्ध स्त्रीला पंजाबीत' बेबे' म्हणतात. त्याला डिवचण्यासाठी त्याला जेव्हा 'बेबे' म्हणण्यात आले, तेव्हा तो म्हणाला, “माझा आता पुनर्जन्म झालेला आहे. मला आता 'बेबे' का म्हणता?” त्याच्या वागणुकीमुळे व बोलण्यामुळे 'वयाला न शोभणारे प्रौढत्व संजीवमध्ये आहे' असे रामप्यारीने म्हटले आहे. १९८५ साली रामप्यारी वारली. नातू या नात्याने १५ वर्षाच्या संजीवनी पैतृक आजीचा अंत्यविधी करावयास हवा. सर्वांनी तसा आग्रह धरला .पण त्याने त्याला ठाम नकार दर्शवला. याचे कारण त्याने सांगितले नसले तरी, आई (संजीव) आपल्या मुलीचा अंत्यविधी कसा करेल हा निष्कर्ष सीताराणीने त्यातून काढला आहे, जो बरोबर आहे असेच म्हणावे लागते. आपण किर्पादेवी असल्याचे या वयातही संजीव विसरला नव्हता हेच या त्याच्या नकार यातून स्पष्ट दिसून येते.

(**Reincarnation and Biology - Vol. I**- Ian Stevenson, 1997,pp.683-697)

**कोर्लिस चोटकिन** - अलास्काच्या क्लिनगिट टोळीच्या व्हिक्टर विन्सेंट या वयस्कर मच्छिमाराने मिसेस चोटकिन या आपल्या भाचीला सांगितले की तो मेल्यानंतर तिचा मुलगा म्हणून जन्म घेणार आहे. (त्याचे चोटकिन कुटुंबियांशी अगदी जिव्हाळ्याचे संबंध होते हे



या भाकिताचे बहुधा कारण असावे.)

आपल्याला ओळखण्यासाठी आपल्या शरीरावरील दोन खुणा त्याने तिला दाखवल्या. एक नाकाच्या हाडाचे जवळची व दुसरी शस्त्रक्रियेमुळे झालेली पाठीच्या वरच्या भागावरची, जी स्वतःत्याने पाहिली नव्हती, पाहणे शक्य नव्हते. या खुणा जन्मतःमाझ्या शरीरावर पाहून तू मी जन्मलो असल्याची तुझी खात्री होईल असे तिला त्याने सांगितले. व्हिक्टर विन्सेंट १९४७च्या वसंत ऋतूत वारला. सुमारे १८ महिन्यानंतर मिसेस चोटकिनने एका मुलाला जन्म दिला. त्याच्या शरीरावर व्हिक्टर विन्सेंटनी दाखवलेल्या दोन खुणा नेमक्या त्याच ठिकाणी जन्मतःच तिला दिसून आल्या. त्याचे नाव त्याच्या वडिलांचे, म्हणजे 'कोर्लीस चोटकिन धाकटा' असे ठेवण्यात आले. तो तेरा महिन्याचा झाल्यावर त्याला स्वतःच्या नावाचा पुनरुच्चार करण्यास ती जेव्हा सांगू लागली, तेव्हा तो म्हणाला, “मी कोण आहे हे तुला माहित नाही काय? कारण मी “काहडोह” आहे. 'काहडोह' हे व्हिक्टर व्हिन्सेंटचे क्लिनगिट टोळीचे मूळ नाव होते. (अलास्कातील आदिम टोळ्यांना ख्रिश्चन करण्यात येऊन त्यांची नावे बदलण्यात आली होती) मिसेस चोटकिनने आपल्या एका आत्याला ही गोष्ट जेव्हा सांगितली तेव्हा ती म्हणाली, “व्हिक्टर व्हिन्सेंटने माझ्या स्वप्नात येऊन चोटकिन कुटुंबात मी जन्म घेणार असल्याचे जन्मण्यापूर्वीच सांगितले होते. ” मात्र तिच्या आत्याला हे माहीत नव्हते की व्हिक्टर व्हिन्सेंटने मिसेस चोटकीनला चोटकिन कुटुंबात आपण जन्म घेणार असल्याचे भाकित केले होते. तो जन्मल्यानंतर आपले स्वप्न खरे ठरल्यामुळे तिच्या आत्याने मिसेस चोटकिनला आपले हे स्वप्न सांगितले.

अडीच तीन वर्षाचा झाल्यानंतर आपल्या पूर्वजन्मातील बायको व मुलांसह नात्यातील इतर सर्व व्यक्तींना त्याने स्वयंस्फूर्तीने बरोबर ओळखले. व्हिक्टर व्हिन्सेंटचे सर्व गुणधर्मही धाकट्या चोटकिनमध्ये आढळून आले. उदा. विक्टर विन्सेंट प्रमाणे चोटकिन(धा) ही डावखुरा होता. त्याच्याप्रमाणेच तोतरा बोलत होता. केस विंचरण्याची पद्धतही व्हिक्टरचीच होती. बोटीबद्दलची आवडही दोघात सारखीच होती. दोघात धार्मिक वृत्तीही सारखीच होती. व्हिक्टर व्हिन्सेंटच्या जीवनात घडलेल्या महत्त्वाच्या घटनाही चोटकिन (धा)ने बरोबर सांगितल्या.

(**Twenty Cases Suggestive of Reincarnation** - Ian Stevenson, 1974)